“सचिन-अ बिलियन ड्रिम्स” या हिंदी चित्रपटास करमणूक शुल्क माफी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएनटी- २०१७/प्र.क्र.८०/टी-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २६ मे, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. : ईएनटी-२०१४/प्र.क्र.३०७/टी-१, दि. १८.०२. २०१६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. : ईएनटी-२०१४/प्र.क्र.३०७/टी-१, दि. २७.०३. २०१५.
३) श्री राजेश नायर, प्रमुख- कार्निवल मोशन पिक्चर्स, मुंबई यांचे दि. १७ मे, २०१७ चे पत्र.
४) चित्रपट सल्लागार समितीचा चित्रपट परिनिरिक्षणाबाबतचा दि. २०.०५.२०१७ चा अहवाल.

प्रस्तावना :-

एखाद्या सर्वसामान्य व्यक्तिला जागतिक दर्जाचा खेळाडू बनण्याकरीता आवश्यक असलेल्या **उच्च ध्येय, कठीण परिश्रम, जिद्द व चिकाटी** यासारख्या **मानवी, कौटुंबिक व सामाजिक मुल्यांबाबतचे** महत्व दर्शवून त्याव्दारे क्रिडा क्षेत्रात अत्युच्च कामगिरी करण्यास भारतातील तरूण पिढीला प्रेरित करणाऱ्या व भारतीय क्रिकेट संघाचे अलौकिक खेळाडू असलेल्या **श्री. सचिन रमेश तेंडूलकर** यांच्या जीवनावर आधारीत **“सचिन-अ बिलियन ड्रिम्स”** या हिंदी चित्रपटास करमणूक शुल्क माफी देण्याबाबतची विनंती श्री. राजेश नायर, प्रमुख- कार्निवल मोशन पिक्चर्स, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास केली होती.

त्यानुषंगाने, महाराष्ट्र करमणूक शुल्क नियम, १९५८ मधील **नियम २४(१)** अन्वये गठीत करण्यात आलेल्या चित्रपट सल्लागार समितीच्या संदर्भाधिन अहवालास अनुलक्षून राज्य शासनास विशेष आदेशांद्वारे कोणत्याही **उच्च शैक्षणिक, सांस्कृतिक व सामाजिक मुल्य** दर्शविणाऱ्या चित्रपटास करमणूक शुल्क भरण्यापासून सूट देण्यासंबंधी महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील **कलम ६ (३)** अनुसार प्राप्त अधिकारांन्वये २०० NOT OUT CINEMAS (P) LTD., मुंबई यांच्याद्वारे निर्मित आणि श्री. जेम्स अर्सकाइन यांचेद्वारे दिग्दर्शित **“सचिन-अ बिलियन ड्रिम्स”** हा हिंदी चित्रपट राज्यातील जास्तीत जास्त प्रेक्षकांपर्यंत पोहोचण्याकरीता सदर हिंदी चित्रपटास करमणूक शुल्क माफी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

भारतीय क्रिकेट संघाचे अलौकिक खेळाडू असलेल्या **श्री. सचिन रमेश तेंडूलकर यांनी उच्च ध्येय, कठीण परिश्रम, धाडस, सबुरी, जिद्द, सांघिक भावना व देशप्रेम यासारख्या मानवी, कौटूंबिक, सामाजिक तसेच राष्ट्रीय मुल्यांचा** आपल्या जीवनात अंगिकार करून क्रिकेट खेळामध्ये केलेल्या असामान्य कामगिरीचे तसेच त्याव्दारे **क्रिडा क्षेत्रात अत्युच्च कामगिरी करण्यासाठी सर्वसामान्य भारतीय तरूण पिढीला दिलेल्या प्रेरणेचा संदेश** समाजापुढे अतिशय प्रभावीपणे मांडणाऱ्या **“सचिन-अ बिलियन ड्रिम्स”** या २०० NOT OUT CINEMAS (P) LTD., मुंबई यांचेद्वारे निर्मित हिंदी चित्रपटास महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियमातील **कलम ६ (३)** अन्वये राज्य शासनास प्राप्त अधिकारांनुसार या शासन निर्णयाच्या दिनांकापासून **सहा महिने** इतक्या कालावधीकरीता करमणूक शुल्क माफी प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२६११५३१९७६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Veer

Digitally signed by Madhav Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22edaeda6d9d0b7d64088adc780cd25e6, cn=Madhav Veer
Date: 2017.05.26 12:57:42 +05'30'

**( डॉ. माधव वीर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१०) श्री. विश्वास प्रभाकरराव वसेकर, (अशासकीय सदस्य), डी-२४, मंत्री हाईट्स, ४९५, शनिवार पेठ, पुणे-३०.
११) श्री. आशिष कुलकर्णी (अशासकीय सदस्य ), बी-११०१, ब्लॉसम बॉलेवॉर्ड, पिंगले फार्म्स, लेन क्र. ७, कोरेगाव पार्क, पुणे-११.
१२) श्रीमती रेणुका शहाणे (अशासकीय सदस्य), ३०३/बी, लिला अपार्टमेंट, गुलमोहर पार्क समोर, यारी रोड, वर्सोवा, अंधेरी (प.), मुंबई-६१.
१३) श्री राजेश नायर, प्रमुख- कार्निवल मोशन पिक्चर्स, मुंबई, ९०१, ९ वा मजला, ए & विंग, एक्सप्रेस झोन, वेस्टन एक्स्प्रेस हायवे, मालाड (पुर्व), मुंबई- ४०० ०९७
१४) उप सचिव (टी-१ कार्यासनाचे नियंत्रक अधिकारी), महसूल व वन विभाग , मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व विभागीय आयुक्त.
१६) सर्व जिल्हाधिकारी.
१७) सर्व अपर जिल्हाधिकारी (करमणूक शुल्क), सर्व जिल्हे.
१८) प्रधान सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई.
२०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
२१) निवड नस्ती, टी-१.